एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत विशेष घटक योजनेच्या उपलब्ध तरतूदीतून अंगणवाडयामधील बालकांना तसेच गर्भवती व स्तनदा मातांसाठी आयुर्वेदिक पौष्टिक बिस्किटे पुरविणे बाबत ..

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग,

शासन निर्णय ,क्रमांक :एबावि २०११ / प्र.क्र.२३६ /का-५

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- २३ सप्टेंबर , २०११.

**वाचा** :-आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे पत्र क्र. मबावि/एबाविसयेयो/का-२/३११२/२०११, दिनांक ३०.७.२०११

**शासन निर्णय** :-एकात्मिक बाल विकास सेवा योजना या केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत विशेष घटक योजनेअंतर्गत उपलब्ध तरतूदीतून गोवर्धन आयुर्फार्मा प्रा.लि.यांचे दर निश्चित केलेल्या दरानुसार राज्यातील नागरी व ग्रामीण प्रकल्पातील ३ वर्षे ते ६ वर्षे वयोगटातील ४२९०२३ अनुसूचित जातींच्या लाभार्थ्यांना प्रति दिन १ बिस्किट यांप्रमाणे ४० दिवसासाठी १७१६०९२० इतकी बिस्किटे (८५८०४६ पुडे) एक बिस्किट पुडा १०० ग्रॅम (२० बिस्किटे) रू २४.७५ हया दराने बिस्किटे खरेदी करण्यास व त्यासाठी येणा-या रु. २,१२,३६,६३९/- (रू दोन कोटी बारा लाख छत्तीस हजार सहाशे एकोणचाळीस फक्त) तसेच गर्भवती व स्तनदा माता अनुसूचित जातीचे लाभार्थ्यांना प्रति दिन २ बिस्किटे ४० दिवसासाठी यांप्रमाणे १२५३९८४० इतकी बिस्किटे (६२६९९२ पुडे) एक बिस्किट पुडा १०० ग्रॅम (२० बिस्किटे) रू २४.७५ हया दराने बिस्किटे खरेदी करण्यास व त्यासाठी येणा-या रु. १,५५,१८,०५२/- (अक्षरी रूपये एक कोटी पंचावन्न लाख अठरा हजार बावन्न फक्त ) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये खालील अटीनुसार मान्यता देण्यात येत आहे.

१) पुरवठयाच्या वेळी मुदतबाहयतेचा कालावधी (Expiry Date) सहा महिन्यापेक्षा कमी नसावा.

२) पुरवठादाराने मागणी प्रमाणे विहीत प्रमाणात , विहीत केलेल्या गुणवत्तेनुसार अनुसूचित जातीचे लाभार्थी असलेल्या ग्रामीण व नागरी क्षेत्रातील सर्व अंगणवाडीपर्यंत मालाचा पुरवठा करण्यात आलेला आहे , याबाबतची खात्री करण्यात यावी. तसेच सदर पुरवठा केलेल्या बाबीवर आयसीडीएसच्या वापरासाठी / शासनामार्फत पुरवठा असा शिक्का मारलेला किंवा लेबल लावलेला असावा. आयुर्वेदिक पौष्टिक बिस्किट / वाटप / पुरवठा व जादा खर्च यामध्ये अनियमितता झाल्यास व लेखा आक्षेप उद्भवल्यास त्याची जबाबदारी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांची राहील.

३) हया योजनेचा लाभ लाभार्थ्यांना पोहचावा या दृष्टीने स्वंयस्पष्ट माहिती, अंगणवाडयात नोंदवहीमध्ये उत्पादनाचा दिनांक / एकूण पुरवठा / एकूण उपयोग / मुदत बाहयतेचा दिनांक व शिल्लक याबाबतची योग्य नोंद ठेवणे इ. बाबत उचित मार्गदर्शक सूचना आयुक्त, महिला व बाल विकास , पुणे हयांनी दयाव्यात.

यासाठी होणारा खर्च सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात, “ मागणी क्र. एक्स-१ २२३६-पोषण आहार,०२, पोषक अन्न व पेये यांचे वितरण, १०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम, ८०, सर्वसाधारण , ००१ संचालन व प्रशासन (०५) (०३)- ,एकात्मिक बाल विकास सेवा योजना **(२२३६०६०८)** (राज्य आरोग्य व पोषण निधीतून भागविलेली रक्कम ) (विशेष घटक योजना), १९ आहार खर्च ” या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. याकरिता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना आहरण, संवितरण व नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक खर्चनि-१००६/प्र.क्र.१/अर्थोपाय, दि.२०.४.२००६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

(श.पा.वारे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे
संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे
संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा, (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत)
संबंधित उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( बाल कल्याण / ग्राम पंचायत), (आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांचे मार्फत)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, (आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांचे मार्फत)
सहाय्यक संचालक (लेखा ) महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
महिला व बाल विकास विभाग, कार्या-४.
निवड नस्ती (कार्यासन-५)